सांकेतांक क्र. 201002101309 11001

आंतरजातीय विवाहास प्रोत्साहन देण्यासाठी
आर्थिक सहाय्याची योजना

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक - आजावि-२००३ /प्र.क्र.५०१/मावक - २,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक : ६ ऑगस्ट, २००४

वाचा- १) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक : युटीए-१०९३/४५५/प्र.क्र.२०३/मावक-२, दि.१२/१/१९९६
२) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक : युटीए-१०९६/प्र.क्र.१५७/मावक-२, दि.१५/३/१९९६
३) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक : युटीए-१०९९/प्र.क्र.४५/मावक -२, दिनांक ३०/१/१९९९
४) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
क्रमांक- सीबीसी-१०९८/प्र.क्र.१५१/मावक- ५, दिनांक ७/५/१९९९

प्रस्तावना :- समाजातील सर्व प्रकारच्या जातीभेदाची आणि असमानतेची दरी दूर होऊन समाज एकसंघ व्हावा म्हणून मागासवर्गीय व सवर्ण यांच्यातील विवाहाप्रमाणेच मागासवर्गीयांमध्ये विविध प्रवर्गातील आंतरजातीय विवाहांनादेखील प्रोत्साहन देण्यासाठी आर्थिक सहाय्य देण्याची योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक-युटीए-१०९९/ प्र.क्र.४५/मावक -२, दिनांक ३०/१/१९९९ अन्वये आंतरजातीय विवाहितांना प्रोत्साहन देण्यासाठी आर्थिक सहाय्य देण्याची योजना अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती व भटक्या जमातींच्या व्यक्तींपैकी एक व्यक्ती व दुसरी व्यक्ती सवर्ण हिंदू, लिंगायत जैन, शिख यांच्यातील असेल तर अशा आंतरजातीय विवाहितांस लागू करण्यात आली आहे. सदर योजना आता मागासवर्गातील अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती , भटक्या जमाती यामधील आंतर प्रवर्गामधील आंतरजातीय विवाहितांनाही या शासन निर्णयाद्वारे दिनांक ३०/१/१९९९ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या सवलती लागू करण्यात येत आहेत.

२. सदर योजनेबाबतच्या इतर अटी व शर्ती पूर्वीप्रमाणे म्हणजे शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग , दिनांक ३०/१/१९९९ व वेळोवेळी काढण्यात आलेल्या आदेशांनुसार लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ६९०/०४/व्यय १४, दिनांक १७.७.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नं. मा. शिलवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक, वि.जा.भ.ज.व वि.मा.प्र.क.,महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती)
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ,जिल्हा परिषद.
सर्व जिल्हा पोलिस अधीक्षक
महालेखापाल ,महाराष्ट्र -१/२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) ,मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन र य का/साधिस कक्ष), मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
पोलिस महानिरीक्षक, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय, मुंबई (योग्य ती प्रसिध्दी देण्यासाठी)
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (बीयुडी/व्यय १४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
सर्व स.स./उ.स./अ.स./क.अ. सां.न्या.सां.का.क्री. व वि.स.विभाग, मंत्रालय,मुंबई
स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, सां.न्या.सां.का.क्री. व वि.स.विभाग, मंत्रालय,मुंबई
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
झोनल डायरेक्टर, केंद्र सरकार, अहमदाबाद
निवड नस्ती, मायक २